आदिवासी उपयोजनेंतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता “औद्योगिक प्रशिक्षण संस्थेचा विस्तार करणे” या योजनेखाली निधी वितरीत करण्याबाबत .
( लेखाशिर्ष २२३० ६०७४ )

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१९ / प्र.क्र. १३ / कार्यासन.६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: - २२ नोव्हेंबर, २०१९.

वाचा -

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१९ /प्र.क्र.४४ / अर्थ-३, दि.१.०४.२०१९
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१९ /प्र.क्र.९२ / अर्थ-३, दि.८.०७.२०१९
३) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग नस्ती क्र. मंजुरी-२६११/२०१९/प्र.क्र.५७/व्यशि-२.

**शासन निर्णय :-**

आदिवासी उपयोजनांतर्गत सन २०१९-२० या वर्षाकरीता मागणी क्र.टी-५, २२३०- कामगार व सेवायोजन, ०३-प्रशिक्षण, ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना, (०१) (०९) औद्योगिक प्रशिक्षण संस्था -कारागीर व पर्यवेक्षक यांचे प्रशिक्षण विस्तार (२२३० ६०७४ ) या लेखाशिर्षाखाली **रु. ९०.०० लाख** इतकी तरतुद अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे.

कौशल्य विकास व उद्योजगता विभागाने संदर्भीत वाचा क्र.३ येथे नमूद नस्तीवरील प्रस्तावास अनुसरुन उपरोक्त योजनेसाठी वित्त विभागाने सं.क्र.२ येथील परिपत्रकाद्वारे अर्थसंकल्पीत तरतुदीच्या **६० टक्के मर्यादेत निधी** उपलब्ध करुन दिलेला आहे. सदर योजनेकरीता खालील तक्त्याप्रमाणे निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून **प्रधान सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई** यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

(रु. लाखात)

| योजनेचे नाव | बाब क्र | अर्थसंकल्पीत तरतुद | सदर शा.नि. वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|
| (०१) (०९) औद्योगिक प्रशिक्षण संस्था -कारागीर व पर्यवेक्षक यांचे प्रशिक्षण विस्तार (२२३० ६०७४ ) | | | |
| | ११- देशांतर्गत प्रवास खर्च | १०.०० | ६.०० |
| | १३-कार्यालयीन खर्च | २०.०० | १२.०० |
| | २१- पुरवठा व सामग्री | २०.०० | १२.०० |
| | ३४-शिष्यवृत्त्या /विद्यावेतने | ४०.०० | २४.०० |
| | | **९०.००** | **५४.००** |

२.	सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. विभागप्रमुख / नियंत्रण अधिकारी यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार सदर निधी याच वर्षात खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच शासन पत्र आदिवासी विकास विभाग क्रमांक अशाशा २०११/ प्र.क्र. ५९ / का.११, दि. १९ जानेवारी, २०१२ अन्वये दिलेल्या सूचनांनुसार खर्च करण्याची दक्षता घ्यावी.

तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास; आदिवासी विकास विभाग व कौशल्य विकास व उद्योजगता विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत सूचना देण्यात यावी.

३.	विभाग प्रमुख / नियंत्रण अधिकारी यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील क्षेत्रात विविध योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी उपयोजना क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर लक्ष ठेवता येईल.

४.	आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतुन आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील क्षेत्रात फक्त वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

५.	उपरोक्त आदेश संदर्भ क्र. १ व २ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहेत.

६.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१९११२०१५३११२००२४** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kiran Kisanrao Pawar

Digitally signed by Kiran Kisanrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, cn=Kiran Kisanrao Pawar
Date: 2019.11.22 14:59:06 +05'30'

**किरण कि. पवार**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. प्रधान सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

२. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
३. प्र. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/ नागपूर/ अमरावती.
५. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
६. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
७. वित्त विभाग ( अर्थ-१९ ) / ( व्यय-१४ ) मंत्रालय, मुंबई-३२
८. निवडनस्ती, कार्यासन- ०६, आदिवासी विकास विभाग.